**ता. येवला येथे थोर स्वातंत्र्य सेनानी तात्या टोपे यांच्या उभारण्यात येत असलेल्या स्मारकासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६२/सां.का.-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ जुलै, २०२३.

**वाचा:**

१) संस्कृती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्रमांक एफ-१३-१/२०१५-स्पेशल सेल, दि.२३.२.२०१६ व दिनांक २२.६.२०१६ चे पत्र.
२) मुख्याधिकारी, येवला नगरपरिषद,येवला यांचे पत्र क्रमांक ४८८/१८, दिनांक २६.३.२०१८ व क्र.३४/२३, दिनांक २७.०१.२०२३.
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.८२१५/प्र.क्र.१२८/सां.का.४, दिनांक १९.११.२०१८.

**प्रस्तावना:**

स्वातंत्र्यसेनानी तात्या टोपे यांच्या २०० व्या जयंतीचे औचित्य साधून त्यांच्या स्मृती प्रित्यर्थ स्थानिक आवश्यकतेनुसार स्मारक उभारण्याचा निर्णय केंद्रीय गृहमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील राष्ट्रीय अंमलबजावणी समितीने दिनांक १९.५.२०१५ च्या बैठकीत घेण्यात आला. त्याअनुषंगाने महाराष्ट्र शासनास प्रस्ताव सादर करण्याचे सुचित केले. त्यावर पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाकडून केंद्र शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने केंद्र शासनाने Centenary and Anniversaries Celebration योजनेंतर्गत दिनांक २३.२.२०१६ च्या पत्रान्वये सदर प्रकल्पाचा २५ टक्के खर्चाचा भार तसेच जागेचा भार राज्य शासनाने उचलावा असे निदेशित केले. त्यानुसार सदर कामाकरीता येणारा खर्च केंद्र शासन हिस्सा ७५ %, राज्य शासन हिस्सा १५ % व नगरपरिषद हिस्सा १० % असे अशा प्रकारे करण्याचे ठरले.

२. नाशिक जिल्हयातील येवला नगर परिषदेच्या हद्दीतील बाभूळगाव (खु.) येथील सर्व्हे क्रमांक ४९, ५० या नगरपालिकेच्या भूखंडावर स्वातंत्र्यसेनानी तात्या टोपे यांचे स्मारक म्हणून माहिती केंद्र, शिल्पकृती, गॅलरी, प्रदर्शन हॉल, वाचनालय, ऑडिओ विज्वल हॉल, प्रतिकात्मक शिल्प गार्डन, लेझर

शो, कॅफेटेरिया, बगीचा, चिल्ड्रन पार्क, पार्किंग या बाबीं अंतर्भूत असलेल्या स्मारकाचा आराखडा व अंदाजपत्रक नगरपरिषद, येवला यांनी तयार केले. सदर कामाच्या ₹ १०,९२,२९,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास व आराखडयास विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तथापि, सदर कामासाठी केंद्र शासनाकडून रु. १०.५० कोटी खर्च अपेक्षित धरुन दि.२२.६.२०१६ च्या पत्राअन्वये केंद्र शासनाच्या ७५% हिश्श्यातील ( ₹७.८८ कोटी) ५०% निधी म्हणजेच ₹३.९४ कोटी निधी आहे. तसेच नगरपरिषद, येवला यांनी १०% हिश्श्यापोटी रु.१.०५कोटी निधी उपलब्ध करुन दिला असून सदर बांधकाम प्रगतीपथावर आहे. त्याचप्रमाणे राज्य शासनाचा १५% हिस्सा म्हणजेच ₹१.५७ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>**:-

थोर स्वातंत्र्य सेनानी तात्या टोपे यांच्या स्मृतीप्रित्यर्थ येवला, जिल्हा नाशिक येथे उभारण्यात येत असलेल्या स्मारकासाठी राज्य शासनाच्या १५% हिश्श्यापोटी ₹.१,५७,००,०००/- (रुपये एक कोटी सत्तावन्न लक्ष फक्त) इतका निधी पुढील अटीच्या अधीन राहून वितरित करण्यास शासन मंजूरी देत आहे.

१.१. संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीची पूर्तता करावी.

१.२. सदर कामाचा भौतिक व आर्थिक साध्यबाबतचा त्रैमासिक अहवाल केंद्र व राज्य शासनास सादर करावा.

१.३. सदर निधीच्या खर्चाचे बाब निहाय उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास व या विभागास पाठवावे.

२. या कामासाठी जिल्हाधिकारी, नाशिक हे नियंत्रक अधिकारी राहतील व त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-०२, २२०५ कला संस्कृती (००) १०२-कला व संस्कृती प्रचालन (०१)(०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (२२०५ १४८१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (कार्यक्रम) या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय वर्षातील मंजूर तरतुदीतून भागविण्यात येईल. मात्र, सदरहू प्रकल्पाबाबत या विभागाकडून देण्यात आलेल्या निधीचा पूर्वोदाहरण म्हणून वापर करता येणार नाही.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या सहमतीनुसार आणि वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३२७/२०२३/व्यय १५, दिनांक ०३.७.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०७१११५५२२४९२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.07.11 19:05:28 +05'30'

**(विद्या वाघमारे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, भारत सरकार, संस्कृती मंत्रालय, नवी दिल्ली- ११०००१.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र , मुंबई
३. जिल्हाधिकारी, नाशिक
४. नगर परिषद, येवला, तालुका येवला, जिल्हा नाशिक
५. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
९. उप सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई (यांना उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित)
१०. निवडनस्ती (सां.का.१).